मानव विकास कार्यक्रम अंतर्गत "ग्रामीण भागातील सर्व मुलींना इयत्ता १२वी पर्यंत शिक्षण घेणे शक्य व्हावे, याकरीता गाव ते शाळा या दरम्यान वाहतुकीची सुविधा उपलब्ध करून देणे", या योजनेअंतर्गत महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या बसेसकरीता आवर्ती खर्चाचे सन २०२०-२१ ते सन २०२२-२३ या कालावधीकरीता प्रति बस प्रति वर्ष दर निश्चित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## नियोजन विभाग

**शासन निर्णय क्रमांक:- माविका-२०२२/प्र.क्र.८०/कार्या.१४१८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- २९ मार्च, २०२३

**वाचा:-**

१. नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. माविमि-२०१०/प्र.क्र.८१/का.१४१८,दि. १९ जुलै, २०११
२. नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. माविका-२०१२/प्र.क्र.६९/का.१४१८,दि. १२ जुलै, २०१२
३. नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. माविका-२०१३/प्र.क्र.७१/का.१४१८,दि. १ मार्च, २०१४
४. नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. माविका-२०२१/प्र.क्र.१/का.१४१८,दि. ३० मार्च, २०२१

**प्रस्तावना:-**

नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. माविमि-२०१०/प्र.क्र.८१/का.१४१८, दिनांक १९.०७.२०११ अन्वये राज्यातील २३ अतिमागास जिल्ह्यातील १२५ तालुक्यांमध्ये "मानव विकास कार्यक्रम" राबविण्यात येत आहे. नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. माविका-२०१२/प्र.क्र.६९/का.१४१८, दिनांक १२ जुलै, २०१२ अन्वये हा कार्यक्रम सन २०१२-१३ पासून निवडलेल्या १२५ तालुक्यातील "क" वर्ग नगरपालिकांमध्ये राबविण्यात येत आहे. "मानव विकास कार्यक्रम"अंतर्गत राबविण्यात येत असणाऱ्या शिक्षणविषयक योजनांमध्ये "ग्रामीण भागातील सर्वच मुलींना इयत्ता १२ वी पर्यंत शिक्षण घेणे शक्य व्हावे याकरीता गाव ते शाळा यादरम्यान वाहतुकीची सोय उपलब्ध करून देणे" या योजनेचा समावेश आहे. या योजनेअंतर्गत प्रत्येक तालुक्यासाठी ५ बसेस याप्रमाणे १२५ तालुक्यांसाठी ६२५ बसेस पहिल्या टप्प्यात महाराष्ट्र राज्य परिवहन महामंडळ यांना खरेदी करून उपलब्ध करून देण्यात आल्या आहेत. त्यानंतर टप्प्याटप्प्याने अतिरिक्त २४७ बसेस खरेदी करण्यात आल्या असून; सद्य:स्थितीत या योजनेअंतर्गत महाराष्ट्र राज्य परिवहन महामंडळामार्फत एकूण ८७२ बसेस उपयोगात आणल्या जात आहेत. शालेय विद्यार्थिनींकरीता गाव ते शाळा दरम्यान प्रति दिन एकूण २ परतीच्या फेऱ्या व सरासरी अंतर २५ किलोमीटर गृहित धरून; एका बसच्या एकूण ४ फेऱ्यांसाठी १०० किलोमीटर अंतर निश्चित करून सर्वसाधारणत: २१५ शैक्षणिक दिवसांसाठी (शालेय सुट्ट्या वगळून) प्रति बस प्रति वर्ष आवर्ती खर्च रू.५.१० लक्ष महाराष्ट्र राज्य परिवहन महामंडळास अदा करण्याची तरतूद नियोजन विभाग शासन निर्णय क्र. माविमि-२०१०/प्र.क्र.८१/का.१४१८, दिनांक १९.०७.२०११ मध्ये करण्यात आली होती.

तद्नंतर वेळोवेळी होणाऱ्या इंधन किंमतीतील दरवाढ, चालनीय किलोमीटर तफावत, चालक व वाहक यांची वेतनवाढ, बसेसच्या देखभाल व दुरूस्तीचा वाढीव खर्च यासारख्या अनेकविध कारणांमुळे प्रति वर्ष प्रति बस आवर्ती खर्चामध्ये झालेली वाढ नियोजन विभाग शा.नि.क्र. माविका २०१३/प्र.क्र.७१/कार्या.१४१८, दि.१.०३.२०१४ अन्वये व नियोजन विभाग शा.नि.क्र. माविका २०२१/प्र.क्र.१/कार्या.१४१८, दि.३०.०३.२०२१ अन्वये सन २०१९-२० या आर्थिक वर्षापर्यंत अनुज्ञेय करण्यात आली आहे. त्यानंतर महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ यांनी केलेल्या मागणीनुसार सन २०२०-२१ ते सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरिता प्रति बस प्रति वर्ष आवर्ती खर्चामध्ये वर्षनिहाय वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. माविमि-२०१०/प्र.क्र.८१/का.१४१८, दि. १९जुलै, २०११ अन्वये "मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत "ग्रामीण भागातील सर्वच मुलींना इयत्ता १२ वी पर्यंत शिक्षण घेणे शक्य व्हावे, या करीता गाव ते शाळा या दरम्यान वाहतुकीची सोय उपलब्ध करून देणे" या शिक्षणविषयक योजनेचा समावेश करण्यात आलेला आहे. या योजनेअंतर्गत महाराष्ट्र राज्य परिवहन महामंडळाला एकूण ८७२ बसेस उपलब्ध करून देण्यात आल्या आहेत. या बसेस चालविण्याकरिता येणाऱ्या प्रति वर्ष प्रति बस आवर्ती खर्चात वाढ करण्याबाबत महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाकडून प्राप्त प्रस्तावानुसार तसेच इंधन किंमतीची दरवाढ, चालनीय किलोमीटर तफावत, चालक व वाहक यांची वेतनवाढ व बसेसच्या देखभाल/दुरूस्तीचा वाढीव खर्च इत्यादींचा विचार करून प्रति बस प्रति वर्ष असणाऱ्या आवर्ती खर्चाची दरवाढ अनुज्ञेय करण्यात येत असून; सन २०२०-२१ ते सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता प्रति वर्ष प्रति बसच्या आवर्ती खर्चाचे दर पुढीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहेत:-

| **अ.क्र.** | **वर्ष** | **प्रति बस प्रति वर्ष अनुज्ञेय दर (रू.लक्ष)** |
|---|---|---|
| १. | २०२०-२१ | २१.७८ |
| २. | २०२१-२२ | २३.९७ |
| ३. | २०२२-२३ | २७.३२ |

२. उपरोक्त सुधारीत दरानुसार त्या-त्या वर्षामध्ये बसेस धावलेल्या प्रत्यक्षात दिवसांसाठीच प्रतिपूर्तीची रक्कम महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ यांना "आयुक्त, मानव विकास" यांचेमार्फत करण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौ.सं.क्र.१३९/२०२३/व्यय-८, दि. २१.०३.२०२३ अन्वये देण्यात आलेल्या त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर हा शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून; त्याचा संकेताक २०२३०३२८१२५९४०४६१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VANITA NARAYAN JADHAV

Digitally signed by VANITA NARAYAN JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=2f0e1884948542877a779b797fc357f1c34d84fe1aa3f9bdc30c060e0431223f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AD56893B2DDC6497ED23D778715C30A6EA094F5D1E0FB38A44AC5B9179A65D83, cn=VANITA NARAYAN JADHAV
Date: 2023.03.29 20:13:33 +05'30'

**( वनिता ना.जाधव )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान महालेखापाल -१/२ (लेखा अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
४. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (सर्व), मंत्रालय, मुंबई
५. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य परिवहन महामंडळ, मुंबई
६. आयुक्त, मानव विकास, छत्रपती संभाजीनगर.
७. विभागीय आयुक्त (सर्व)
८. जिल्हाधिकारी (सर्व)
९. मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व)
१०. जिल्हा नियोजन अधिकारी, मानव विकास (सर्व)
११. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१२. निवड नस्ती.